**महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या योजनेअंतर्गत योजनेच्या निकषानुसार लाभार्थ्यांच्या पात्र थकीत रकमेवर दि.१.१०.२०१९ ते योजनेचा प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांनी व्याज आकारणी न करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार , पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन आदेश क्र. कृकमा ०१२०/प्र.क्र.०९/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : १७ जानेवारी, २०२०

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७ /२-स, दि.२७ डिसेंबर, २०१९
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृषीपत-०८/ म.जो.फले कर्जमुक्ती योजना/व्याज आकारणी/२०२०, दि.९.१.२०२०
३) महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७९अ

ज्याअर्थी, महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या योजनेची अंमलबजावणी राज्यात सुरु असुन, सदर योजनेस पात्र असणा-या शेतक-यांना रु.२.०० लाखापर्यंत कर्जमाफीचा लाभ देण्यात येत आहे. शासन निर्णय दिनांक २७ डिसेंबर २०१९ मध्ये नमुद केल्याप्रमाणे शेतक-यांकडील दि. १.४.२०१५ ते दि.३१.३.२०१९ पर्यंत उचल केलेल्या एक किंवा एकापेक्षा जास्त ज्या कर्ज खात्यात अल्पमुदत पीक कर्जाची दि.३०.९.२०१९ रोजी मुद्दल व व्याजासह थकीत असलेली व परतफेड न झालेली रक्कम रु.२.०० लाखापर्यंत कर्जमुक्तीस पात्र धरण्यात आलेली आहे. तसेच दि. १.४.२०१५ ते दि.३१.३.२०१९ पर्यंत वाटप केलेल्या अल्पमुदत पीक कर्जाचे, पुनर्गठन / फेरपुनर्गठन करुन मध्यम मुदत कर्जात रुपांतर केलेल्या एक किंवा एकापेक्षा जास्त ज्या कर्ज खात्यात दि. ३०.९.२०१९ रोजी मुद्दल व व्याजासह थकीत असलेल्या व परतफेड न झालेल्या हप्त्याची रक्कम रु.२.०० लाखापर्यंत कर्जमुक्तीस पात्र करण्यात आलेली आहे.

ज्याअर्थी, दि.३०.९.२०१९ पर्यंत अशा पीक/ पुनर्गठीत कर्जावरील व्याजाची जबाबदारी शासनाने स्विकारली आहे. सदर शासन निर्णयानुसार शेतक-यांच्या कर्जखात्यांमध्ये प्रत्यक्ष कर्जमाफीची रक्कम वर्ग करण्यास काही अवधी लागण्याची शक्यता आहे. यामध्ये माहिती तयार करण्यासाठीची संगणकीय प्रणाली (पोर्टल) तयार करुन बँकांना उपलब्ध करुन देणे, बँकांमार्फत या प्रणालीमध्ये संबंधित शेतक-यांची कर्जखात्याची माहिती अपलोड करणे, शेतक-यांनी कर्जखात्यांना आधार क्रमांकांची जोडणी करणे, संगणक प्रणालीवर अपलोड करण्यात आलेल्या माहितीचे संगणकीय संस्करण करणे, आधार प्रमाणीकरण करणे इत्यादी कामकाजाचा समावेश आहे. सदर कारणांमुळे शेतक-यांना कर्जमुक्तीचा लाभ देण्यास काही कालावधी लागणार आहे.

महात्मा ज्योतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजनेबाबत मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय बँकर्स समितीची विशेष बैठक दि.३.१.२०२० रोजी संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये सभासद बँकांनी योजनेअंतर्गत लाभार्थ्यांच्या कर्जखात्यावर दिनांक ३०.९.२०१९ नंतर योजनेअंतर्गत प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत व्याज आकारणी न करण्याच्या मुद्दयावर तत्वत: सहमती दर्शविली आहे. जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका तथा विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांमार्फत दि.३०.९.२०१९ नंतर शेतक-यांच्या कर्जखात्यावर व्याज आकारणी केल्यास संबंधित शेतक-यास कर्जमाफीचा लाभ मिळाल्यानंतरही संबंधित शेतक-याचे कर्जखाते निरंक होणार नाही व कर्जखाते थकीत असेल. परिणामी, शेतक-यास आगामी खरीप हंगामासाठी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांमार्फत पीक कर्ज उपलब्ध होणार नाही. याबाबत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या दि.२७.१२.२०१९ रोजीच्या महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई येथील सभागृहामध्ये झालेल्या सभेमध्ये याबाबत चर्चा झालेली आहे. तथापि, काही जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, तसेच, प्राथमिक कृषि पतपुरवठा संस्था/ विकास संस्था त्यांच्या स्तरावर कर्जखात्यावर व्याज आकारणी करण्याची शक्यता नाकारता येत नाही. यामुळे शेतक-यांची कर्जखाती निरंक करण्याच्या योजनेच्या मुळ उद्देशास बाधा येत आहे.

ज्याअर्थी, वरील वस्तुस्थिती विचारात घेता सदर योजनेंतर्गत सर्व शेतक-यांची खाती निरंक होवून त्यांना नव्याने शेती कर्ज उपलब्ध होण्याच्या दृष्टीने व्यापारी बँका आणि जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था यांच्या स्तरावर योजनेअंतर्गत लाभार्थ्यांच्या कर्जखात्यावर दिनांक १.१०.२०१९ पासून योजनेअंतर्गत प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत व्याज आकारणी न करण्याच्या कृतीत एकवाक्यता असणे आवश्यक आहे.

ज्याअर्थी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांनी कर्जमुक्ती योजनेंतर्गत दि.१.१०.२०१९ ते योजनेचा प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत पात्र थकीत अल्पमुदत पीक कर्जाच्या, तसेच, अल्पमुदत पीक कर्जाचे, पुनर्गठन / फेरपुनर्गठन करुन मध्यम मुदत कर्जात रुपांतर केलेल्या कर्जाच्या रकमेवर व्याज आकारण्यात येवू नये असे निर्देश सर्व संबंधितांना महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७९अ खाली देणे लोकहिताच्या दृष्टीने आवश्यक झाले आहे.

त्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७९अ नुसार शासनास असलेल्या अधिकारान्वये राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था यांना लोकहितार्थ शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

## आदेश

महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या योजनेस पात्र असणा-या शेतक-यांच्या अल्पमुदत पीक कर्ज, तसेच, अल्पमुदत पीक कर्जाचे, पुनर्गठन / फेरपुनर्गठन करुन मध्यम मुदत कर्जात रुपांतर केलेल्या कर्ज खात्यावर दिनांक १.१०.२०१९ ते योजनेचा प्रत्यक्ष लाभ मिळेपर्यंत योजनेच्या निकषानुसार पात्र लाभार्थ्यांच्या कर्ज खात्यामधील थकीत रकमेवर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्थांनी व्याजाची आकारणी करु नये.

सदरचा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११७१६५१००१००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.01.17 16:55:32 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
४) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व)
५) विविध कार्यकारी सेवा सहकारी संस्था (सर्व)